सन २०२१-२२ या वर्षापासून क्रीडा सुविधा निर्मितीसाठी आर्थिक सहाय्य योजनेंतर्गत आर्थिक सहाय्य वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः क्रीडायो-२३२१/प्र.क्र.२८७/क्रीयुसे-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: ३१ मार्च, २०२२

वाचा :

१) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. राक्रीधो-२०१२/प्र. क्र. २६०/क्रीयुसे-१ दि. ०१ मार्च, २०१४.
२) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. क्रीडासु-३०२०/प्र. क्र. १६६/क्रीयुसे-१ दि. २७ मे, २०२१
३) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग शासन निर्णय क्र. क्रीडासु-३०२०/प्र. क्र. १६६/क्रीयुसे-१ दि. १५ सप्टेंबर, २०२१,
४) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. क्रीसुनि/आर्थिक सहाय्य/२०२१-२२/का-९/११५७ दि. १० मार्च, २०२२.

प्रस्तावना :

राज्यातील खाजगी/शासनाच्या मार्फ़त चालविण्यात येणा-या व राज्य शासनाच्या संबंधित विभागांनी मान्यता दिलेल्या शैक्षणिक संस्था, विविध खेळांच्या विकासासाठी कार्यरत असणा-या असणा-या व सार्वजनिक विश्वस्त अधिनियम १९५० किंवा संस्था नोंदणी अधिनियम १८६० अन्वये पंजीबद्ध असतील अन्वये पंजीबद्ध असतील अशा व्यायाम संस्था, क्रीडा मंडळे, क्रीडा संघटना इत्यादींना क्रीडा सुविधा निर्मितीस व क्रीडा साहित्यासाठी ७५:२५ (शासन व संबंधित संस्था) या प्रमाणात अनुदान देण्यास संदर्भाधीन क्र. १ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. "क्रीडा सुविधा निर्मितीसाठी आर्थिक सहाय्य करणे" ही क्रीडा धोरणातील एक महत्वाची शिफारस आहे. राज्यातील शैक्षणिक संस्था, खाजगी क्लब, क्रीडा मंडळे, प्राधिकरणे, स्थानिक स्वराज्य संस्था यामधून दर्जेदार क्रीडा सुविधा निर्माण करुन त्याव्दारे खेळाडूंच्या कामगिरीत वाढ करुन राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय खेळाडू निर्माण करण्यास चालना देणे, हे या योजनेचे उद्दिष्ट आहे. या संदर्भातील सविस्तर कार्यपध्दती उपरोक्त संदर्भाधीन क्र. (१) येथील शासन निर्णय दिनांक ०१ मार्च, २०१४ अन्वये विहीत करण्यात आली आहे. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचेकडून शासनास प्राप्त झालेल्या विविध संस्थांच्या प्रस्तावांना संदर्भाधीन क्र. (२) व (३) येथील शासन निर्णयांन्वये तत्वत: प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. तसेच यापूर्वी अंशत: अनुदान (पहिला/दुसरा टप्पा) देण्यात आलेल्या संस्थांचा उर्वरीत निधी मागणीचा प्रस्ताव संदर्भाधीन क्र. (४) अन्वये आयुक्त, क्रीडा व युवक सेवा संचालनालय यांनी संदर्भ क्र. ४ अन्वये शासनास सादर केला आहे. उपरोक्त प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या संस्थांना तसेच यापूर्वी अंशत: अनुदान (पहिला/दुसरा टप्पा) देण्यात आलेल्या संस्थांना पुढील टप्प्यातील अनुदान उपलब्ध करुन

देण्याकरीता सन २०२१-२२ या वर्षात आर्थिक सहाय्य उपलब्ध करण्यासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

सन २०२१-२२ या वर्षाकरीता क्रीडा सुविधा निर्मितीसाठी आर्थिक सहाय्य उपलब्ध करण्याकरीता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या रु.१८००.०० लक्ष तरतूदीमधून ६०% च्या मर्यादेत रु. १०८०.०० लक्ष ( अक्षरी रुपये दहा कोटी ऐंशी लाख फक्त) इतकी तरतूद सोबतच्या विवरणपत्र "अ" व "ब" मध्ये दर्शविण्यात आल्याप्रमाणे संबंधित संस्थांना अनुदान देण्यासाठी वितरीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे. सदर मान्यता खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

(१) शासन निर्णय दिनांक ०१ मार्च २०१४ मधील बाब क्र. ४ (ब) क्रीडा साहित्यासाठी अनुदान मंजुरीच्या अटी व शर्ती नुसार संबंधित संस्थांना अनुदान वितरीत करण्याची कार्यवाही करावी.

(२) संबंधित संस्थेस सोबतच्या प्रपत्र "अ" व "ब" या विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे अनुदान वितरित झाल्यानंतर प्रकल्प पूर्णत्वाचा दाखला, प्रकल्पाच्या छायाचित्रांसह व उपयोगीता प्रमाणपत्रासह लवकरात लवकर व कमाल १ वर्षाच्या कालमर्यादेत सादर करणे बंधनकारक राहील, अन्यथा वितरित अनुदान शासनाच्या प्रचलित दंडनीय व्याज दराने अनुदान वितरीत झाल्याच्या दिनांकापासून वसुल करण्यात येईल, ही अट मान्य असल्याचे हमीपत्र प्रतिज्ञापत्राद्वारे संबंधित संस्थेकडून घेण्यात यावे. तसेच प्रपत्र "ब" मधील संबंधित संस्थेस एकूण मंजूर करण्यात येणाऱ्या अनुदानाच्या १०% रकमेची बँक गॅरेंटी घेणे आवश्यक राहील. त्यानुसार बँक गॅरेंटी व प्रतिज्ञापत्र संबंधित जिल्हा क्रीडा अधिकारी यांच्याकडे जमा करण्यात आल्यानंतर मंजूर रकमेच्या वितरणासाठी उपलब्ध होणारा निधी संबंधित संस्थेस आर.टी.जी.एस. द्वारे वितरीत करण्यात यावा.

(३) शासन अनुदान व स्वहिस्सा खर्च करून विनियोग प्रमाणपत्र सादर करणे बंधनकारक राहील. संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णय दिनांक ०१ मार्च, २०१४ मधील परिच्छेद क्र. ४ (ब) (१०) नुसार शासकिय संस्थांना स्वहिस्स्याची अट लागू राहणार नाही.

(४) प्रपत्र "ब" मधील संबंधित संस्थेकडून स्वहिस्सा २५% आणि देय अनुदानापैकी या शासन निर्णयान्वये वितरीत केलेले अनुदान प्रथम खर्च करून सदर बांधकामांच्या सद्यस्थितीतील छायाचित्रांसह सनदी लेखापालाच्या स्वाक्षरीचे खर्चाचे विवरणपत्र सादर केल्यानंतरच क्षेत्रीय कार्यालय / संचालनालयाकडून संबंधित संस्थेस उर्वरीत देय रक्कम पुढील आर्थिक वर्षात उपलब्ध तरतूदीच्या अधीन राहून वितरीत करण्यात यावी.

(५) संबंधित संस्थेने स्वहिश्याची २५% रक्कम प्रथम खर्च करून वरील अनुक्रमांक (२) मध्ये नमूदकेल्याप्रमाणे संबंधित जिल्हा क्रीडा अधिका-याकडे विवरणपत्र सादर केल्यानंतर संबंधित संस्थेची बँक गॅरेंटी मुक्त करण्यात यावी.

२.     उपरोक्त अटींच्या अधीन राहून सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरीता क्रीडा सुविधा निर्माण करण्यासाठी आर्थिक सहाय्य उपलब्ध करण्याकरीता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या रु. १८००.०० लक्ष तरतूदीमधून वित्त विभागाने उपलब्ध करुन दिलेल्या रु. १०८०.०० लक्ष इतक्या तरतुदीमधून सदर निधी वितरीत करण्यात यावा.

३.     क्रीडा सुविधा निर्मितीकरीता आर्थिक सहाय्य यासंदर्भात होणारा खर्च "मागणी क्र. ई-३ लेखाशिर्ष २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०४ क्रीडा व खेळ, (४०) क्रीडा सुविधा, (४०) (०१) क्रीडा सुविधा निर्माण करण्यासाठी सहाय्य (कार्यक्रम) (२२०४५७०६), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशीर्षाखालील या वर्षाच्या उपलब्ध तरतूदीमधून करण्यात यावा.

४.     वित्त विभाग दिनांक  च्या परिपत्रकातील सूचनानुसार उपरोक्त तरतूद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. याकरीता संबंधित जिल्हा क्रीडा अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५.     सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३१/१४७१, दि. २५.०१.२०२२ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३६१/२०२२/व्यय-५, दि. २३.०३.२०२२ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६.     सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३३११२४६२३४५२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swati Madhukar Nanal

Digitally signed by Swati Madhukar Nanal
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=82e1d6f07c5cabf5884958ee70015d36b35b2c07e9700fe62cba2439a81b4be4, serialNumber=007d84f8ce44beba86b0ca2d0155d67cc1a9db4f8d59bc9d8067628d62bcdc1a, cn=Swati Madhukar Nanal
Date: 2022.03.31 15:31:26 +05'30'

(स्वा. म. नानल)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री, क्रीडा व युवक कल्याण यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
४. मा. विरोधी पक्षनेता (विधानसभा/विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक मुंबई
५. मा. राज्यमंत्री क्रीडा व युवक कल्याण यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
६. सर्व विधानसभा / विधानपरिषद सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७. मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
८. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय मुंबई यांचे स्वीय सहायक
९. अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक

१०.अपर मुख्य सचिव (नियोजन), मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
११. मा. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
१२.मा. महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
१३.आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे
१४.सर्व विभागीय उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा (क्रीडा व युवक सेवा संचालनालयामार्फ़त)
१५.सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी (क्रीडा व युवक सेवा संचालनालयामार्फ़त)
१६.वित्त विभाग (कार्यासन व्यय-५/अर्थसंकल्प-८) मंत्रालय, मुंबई
१७.नियोजन विभाग (कार्यासन-१४७१) मंत्रालय, मुंबई
१८. निवडनस्ती (क्रीयुसे-१)

## प्रपत्र-अ

### क्रीडा सुविधा निर्मिती अंतर्गत यापूर्वी अंशत: अनुदान वितरीत केलेल्या व या शासन निर्णयान्वये अनुदानाचा पुढील टप्पा द्यावयाच्या संस्थाची यादी

(रक्कम- लाखांत)

| अ. क्र. | संस्थेचे नांव | प्रकल्प/प्रयोजन | राज्य शासन अनुदान मर्यादा (७५ %) | यापूर्वी वितरीत अनुदान | | एकुण वितरीत अनुदान | या शासन निर्णयान्वये वितरित करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | प्रथम हप्ता | द्वितीय हप्ता | | |
| १ | श्री.शिवलींगेश्वर शिक्षण संस्था, संख, ता.जत, जि.सांगली. | बंदिस्त प्रेक्षागृह | ६७.५० | २९.२५ | १०.०० | ३९.२५ | १०.०० |
| २ | श्री. दादा पाटील राजळे कला व विज्ञान महाविद्यालय आदिनाथनगर ता.पाथर्डी जि. अहमदनगर | बंदीस्त प्रेक्षागृह | ९०.०० | ५८.५० | -- | ५८.५० | २०.०० |
| ३ | कॉस्मो पॉलीटन एज्युकेशनल ॲण्ड वेलफेअर सोसायटी, नांदखेडा रोड, परभणी | बंदिस्त प्रेक्षागृह | ९०.०० | ५८.५० | -- | ५८.५० | २५.०० |
| ४ | जिजाऊ बहुउद्देशीय संस्था, अंमळनेर, जिल्हा जळगांव. | जलतरण तलाव | ९०.०० | २९.२५ | १४.४० | ४३.६५ | ३०.०० |
| ५ | रामरत्न एज्युकेशन फौंडेशन, इस्लामपूर ता. वाळवा, जि. सांगली. | बंदिस्त प्रेक्षागृह | ९०.०० | १८.०० | -- | १८.०० | ४०.०० |
| ६ | महर्षी प्रतिष्ठान, श्री साई शांती निकेतन स्कूल, अंतरवली ता.नेवासा जि. अहमदनगर. | बंदिस्त प्रेक्षागृह | ९०.०० | १०.०० | -- | १०.०० | ४०.०० |
| ७ | संस्कृती संवर्धन मंडळ शारदानगर सगरोळी, ता. बिलोली जि. नांदेड. | बंदिस्त प्रेक्षागृह | ९०.०० | १०.०० | -- | १०.०० | १०.०० |
| ८ | श्रीराम शिक्षण संस्था, पानीव ता. माळशिरस जि. सोलापूर | जलतरण तलाव | ९०.०० | १०.०० | -- | १०.०० | १०.०० |
| | **एकूण वितरीत करावयाचा निधी (लक्ष रुपयांत)** | | | | | | **१८५.००** |

## प्रपत्र-ब

## शासन निर्णय दि. २७ मे, २०२१ व दि. १५ सप्टेंबर, २०२१ अन्वये प्रशासकीय मान्यता दिलेल्या व या शासन निर्णयान्वये अनुदानाचा प्रथम टप्पा द्यावयाच्या संस्थांची यादी

(रक्कम-लाखांत)

| अ. क्र. | संस्थेचे नांव | प्रकल्प/प्रयोजन | प्रकल्पाची अंदाजपत्र-कीय किंमत | शासन निर्णया-नुसार अपेक्षित अंदाजित खर्च | राज्यशासन अनुदान मर्यादा (७५%) | संस्थेचा हिस्सा (२५%) | या शासन निर्णयान्वये वितरित करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १. | अंमळनेर नगरपरिषद, जि जळगाव | जलतरण तलाव | २५६.०२ | १२०.०० | ९०.०० | ३०.०० | २५.०० |
| २. | बाळभगवान शिक्षण प्रसारक मंडळ, अहमदपूर, जि. लातूर | धावनपथ / सिंडर ट्रॅक | २३.२७ | २०.०० | १५.०० | ०५.०० | १५.०० |
| ३. | माऊली चॅरीटेबल ट्रस्ट एकंबी, ता. औसा, जि. लातूर | बंदिस्त प्रेक्षागृह | ४०.८० | ४०.०० | ३०.०० | १०.०० | ०५.०० |
| ४. | कोल्हापुर महानगरपालीका, कोल्हापूर | जलतरण तलाव | १९३.३३ | १२०.०० | ९०.०० | ३०.०० | २०.०० |
| ५. | नुतन विद्यालय शिक्षण संस्था सेलू, संचलित सेलू विद्यालय सेलू, जि. परभणी | बंदिस्त प्रेक्षागृह | १६६.३१ | १२०.०० | ९०.०० | ३०.०० | २०.०० |
| ६. | कर्मवीर पुंजाबाबा गोवर्धने कला, वाणिज्य व विज्ञान महा. इगतपुरी, टाके घोटी, जि. नाशिक | बंदिस्त प्रेक्षागृह | १३०.७८ | १२०.०० | ९०.०० | ३०.०० | २५.०० |
| ७. | वैभव शिक्षण संस्था, विटा, जिल्हा सांगली | बंदिस्त प्रेक्षागृह | ९७.७८ | ९०.०० | ६७.५० | २२.५० | २०.०० |
| ८. | नगर परिषद, कुर्डुवाडी, ता. माढा, जि.सोलापूर | बंदिस्त प्रेक्षागृह | ९९.२७ | ४० | ३० | १०.०० | १०.०० |
| ९. | विश्वेश्वरय्या अभियांत्रीकी पदविका महाविद्यालय, आलमला, ता. औसा जि. लातूर | बंदिस्त प्रेक्षागृह | १७०.२८ | १२०.०० | ९०.०० | ३०.०० | १०.०० |
| १० | जयशिव बहु. शिक्षण मंडळ सावरगांव संचलित विद्यावर्धिनी विद्यालय अहमदपूर जि. लातूर | बंदिस्त प्रेक्षागृह | ४०.०० | ४०.०० | ३०.०० | १०.०० | १०.०० |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ११ | श्री शिवाजी शिक्षण संस्था द्वारा डॉ पंजाबराव उपाख्य भाऊसाहेब देशमुख स्मृती वैद्यकीय महाविद्यालय, अमरावती | बंदिस्त प्रेक्षागृह | ४५५.०१ | १२०.०० | ९०.०० | ३०.०० | ६०.०० |
| १२ | म्हसवड नगरपरिषद म्हसवड, मौ.वीरकरवाडी, ता. माण, जि. सातारा | बंदिस्त प्रेक्षागृह | १५५.७५ | १२०.०० | ९०.०० | ३०.०० | ४५.०० |
| १३ | ग्रामपंचायत मौ.हेळगांव, ता.कराड, जि.सातारा | बंदिस्त प्रक्षागृह बांधकाम | १५५.७६ | १२०.०० | ९०.०० | ३०.०० | १५.०० |
| १४ | पार्वती लाड एज्युकेशन सोसायटी, कुंडल ता. पलूस जि सांगली | बंदिस्त प्रेक्षागह | १२०.४२ | ९०.०० | ६७.५० | २२.५० | १०.०० |
| १५ | एच.एम.एस. रिसर्च ॲन्ड एज्यु. फाऊंडेशन, जालना. | बंदिस्त प्रेक्षागृह | १२०.०० | १२०.०० | ९०.०० | ३०.०० | १७.५० |
| १६ | अतुल विद्यामंदिर, वर्धा द्वारा संचलित राजर्षी शाहू महाराज महाविद्यालय, चांदुररेल्वे,जि.अमरावती | बंदिस्त प्रेक्षागृह | १५३.०४ | १२०.०० | ९०.०० | ३०.०० | २०.०० |
| १७ | भिमाशंकर ग्रामोद्योग संस्था, पिंपळगांव बसवंत, ता.निफाड, जि.नाशिक | जलतरण तलाव | २८५.३२ | ६०.०० | ४५.०० | १५.०० | १५.०० |
| १८ | हिंगोली जिल्हा क्रीडा संकुल , हिंगोली | बंदिस्त प्रेक्षागृह | १२०.०० | १२०.०० | ९०.०० | ३०.०० | १०.०० |
| १९ | हिंगोली जिल्हा क्रीडा संकुल , हिंगोली | ॲस्ट्रोटर्फ हॉकी मैदान | ७५.०० | ७५.०० | ५६.२५ | १८.७५ | १५.०० |
| २० | हिंगोली जिल्हा क्रीडा संकुल, हिंगोली | शुटींग रेंज | ५०.०० | १०.०० | ७.५० | ०२.५० | ०७.५० |
| २१ | हिंगोली जिल्हा क्रीडा संकुल, हिंगोली | स्केटींग रिंक तयार करणे | १०.०० | १०.०० | ७.५० | ०२.५० | ०७.५० |
| २२ | संत ज्ञानेश्वर शिक्षण संस्था, इस्लामपूर चे अण्णा डांग़े महाविद्यालय, हातकणंगले, जि. कोल्हापूर | बंदिस्त प्रेक्षागृह | १०५.७२ | ९०.०० | ६७.५० | २२.५० | ०५.०० |
| २३ | श्री. दत्ता मेघे बाल कल्याण शिक्षण संस्था, नागपूर द्वारा संचालीत स्कुल ऑफ स्कॉलर्स धामणगाव रेल्वे, जि. अमरावती | बास्केटबॉल मैदान तयार करणे. | १३.४७ | १०.०० | ७.५० | ०२.५० | ०५.०० |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| २४ | श्री दत्ता मेघे बाल कल्याण शिक्षण संस्था, नागपूर द्वारा संचालित स्कुल ऑफ स्कॉलर्स, यवतमाळ | लॉन टेनिस सिंथेटिक मैदान | २३.७६ | २०.०० | १५.०० | ०५.०० | ०५.०० |
| २५ | कै. राधाबाई मेघे महिला शिक्षण संस्था, नागपूर द्वारा संचलीत स्कुल ऑफ स्कॉलर्स वरुड जि. अमरावती | स्केटींग रिंक तयार करणे | १३.७३ | १०.०० | ७.५० | ०२.५० | ०७.५० |
| २६ | कै. राधाबाई मेघे महिला शिक्षण संस्था, नागपूर द्वारा संचलीत स्कुल ऑफ स्कॉलर्स, हिंगणाघाट जि. वर्धा | फुटबॉल मैदान | १३.४३ | १०.०० | ७.५० | ०२.५० | ०७.५० |
| २७ | जनकल्याण विकास मंडळ संचलित स्व. लिलावती सतीश आव्हाड डी. फार्मसी कॉलेज, होकर्णा तांडा ता. मुखेड, जि. नांदेड | बंदिस्त प्रेक्षागृह | १६३.९० | १२०.०० | ९०.०० | ३०.०० | २०.०० |
| २८ | जनकल्याण विकास मंडळ संचलीत, कै. लिलावती सतिष आव्हाड डी. फार्मसी खरब खंडगांव ता. मुखेड | जलतरण तलाव | १५९.९९ | १२०.०० | ९०.०० | ३०.०० | १७.५० |
| २९ | भारत शिक्षण प्रसारक मंडळ, देऊळगांव धुबे, ता.चिखली, जि.बुलढाणा | बंदिस्त प्रेक्षागृह | ९०.२५ | ९०.०० | ६७.५० | २२.५० | १०.०० |
| ३० | भाऊसाहेब मुळूक चॅरीटेबल, नागपूर द्वारा संचालीत भाऊसाहेब मुळूक कॉलेज ऑफ़ डी. फार्मसी, उमरेड जि. नागपूर | जलतरण तलाव | ५२.२५ | ५०.०० | ३७.५० | १२.५० | १४.५० |
| ३१ | भाऊसाहेब मुळूक चॅरीटेबल, नागपूर द्वारा संचालीत भाऊसाहेब मुळूक कॉलेज ऑफ़ डी. फार्मसी, उमरेड जि. नागपूर | क्रीकेट मैदान | ११.४९ | १०.०० | ७.५० | ०२.५० | ०७.५० |
| ३२ | बॅकवर्ड क्लास युथ रिलिफ कमेटी नागपूर द्वारा भिवापूर क. महा. भिवापूर | बास्केटबॉल कोर्ट तयार करणे | ११.७० | १०.०० | ७.५० | ०२.५० | ०७.५० |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ३३ | श्री सदाशिवराव पाटील शिक्षण संस्था, कामठी द्वारा संचलीत अनुराग अध्यापक महाविद्यालय, वरठी, ता. मोहाडी, भंडारा. | बंदिस्त प्रेक्षागृह | ४०.२३ | ४०.०० | ३०.०० | १०.०० | ३०.०० |
| ३४ | जयभवानी बहुउद्देशिय सेवाभावी संस्था,अवलगांव, ता.सोनपेठ,जि. परभणी. | बंदिस्त प्रेक्षागृह | ४०.०० | ४०.०० | ३०.०० | १०.०० | १०.०० |
| ३५ | वीर बाजीप्रभू क्रीडा व व्यायाम मंडळ, बेलोरा, ता.चांदुरबाजार, जि.अमरावती | बंदिस्त प्रेक्षागृह | १२०.०० | १२०.०० | ९०.०० | ३०.०० | १५.०० |
| ३६ | सहयाद्री शिक्षण संस्था, सावर्डे, ता.चिपळूण, जि.रत्नागिरी | बंदिस्त प्रेक्षागृह | ४०८.५६ | १२०.०० | ९०.०० | ३०.०० | २०.०० |
| ३७ | तालुका क्रीडा संकुल, खंडाळा, जि.सातारा. | बंदिस्त प्रेक्षागृह | १२०.०० | १२०.०० | ९०.०० | ३०.०० | १५.०० |
| ३८ | रामरत्न एज्युकेशन फाऊंडेशन, इस्लामपूर, ता.वाळवा, जि.सांगली. | ॲस्ट्रोटर्फ हॉकी मैदान | ७८.८० | ७५.०० | ५६.२५ | १८.७५ | १०.०० |
| ३९ | वसंतराव अडसूळ सामाजिक बहुउद्देशिय संस्था, लोहटा, कळंब, जि.उस्मानाबाद | बंदिस्त प्रेक्षागृह | १२२.२७ | १२०.०० | ९०.०० | ३०.०० | १०.०० |
| ४० | ज्ञानगंगा शिक्षण प्रसारक मंडळ, एकशिव, संचलित गोविंद आश्रमशाळा, एकशिव, ता.माळशिरस,जि.सोलापूर | बंदिस्त प्रेक्षागृह | १७१.९५ | १२०.०० | ९०.०० | ३०.०० | १५.०० |
| ४१ | मोकाशी कृषी विकास प्रतिष्ठान, राजमाची, ता.कराड, जि.सातारा. | जलतरण तलाव | ५२.६० | ५०.०० | ३७.५० | १२.५० | १०.०० |
| ४२ | श्री ज्ञानेश्वर समाज प्रबोधन संस्था, पेठ, ता.चिखली, जि.बुलढाणा | बंदिस्त प्रेक्षागृह | ९१.८५ | ९०.०० | ६७.५० | २२.५० | १०.०० |
| ४३ | प्रकाशचंद जैन बहुउद्देशिय संस्था, जामनेर, ता.जामनेर, जि.जळगांव | बंदिस्त प्रेक्षागृह | १२५.२८ | १२०.०० | ९०.०० | ३०.०० | १५.०० |
| ४४ | नवयुवक शिक्षण प्रसारक मंडळ, चापोली, ता.चाकूर, जि.लातूर | बंदिस्त प्रेक्षागृह | १२०.०० | १२०.०० | ९०.०० | ३०.०० | १०.०० |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ४५ | श्री कपालेश्वर एज्युकेशन सोसायटीचे जगदिशचंद्र महिंद्र हायस्कूल, चिंचोली पो.घोडेगांव, ता.आबेगांव, जि.पुणे. | बंदिस्त प्रेक्षागृह | ९४.९५ | ९०.०० | ६७.५० | २२.५० | १०.०० |
| ४६ | ग्रामपंचायत, चमक खुर्द, ता.अचलपूर, जि.अमरावती | बंदिस्त प्रेक्षागृह | ४०.०० | ४०.०० | ३०.०० | १०.०० | ०५.०० |
| ४७ | नवमहाराष्ट्र शिक्षण मंडळ, शेवगांव, संचलित आबासाहेब काकडे कला महाविद्यालय, बोधेगाव, ता. शेवगांव, जि. अहमदनगर. | बंदिस्त प्रेक्षागृह | १४८.०० | १२०.०० | ९०.०० | ३०.०० | १०.०० |
| ४८ | सैनिक स्कूल, सातारा | लॉन टेनिस सिंथेटीक मैदान | २२.६३ | २०.०० | १५.०० | ५.०० | ०५.०० |
| ४९ | ग्रामपंचायत खवणे, पिंपरी, ता. सेलु, जि. परभणी | बंदिस्त प्रेक्षागृह | ६०.६० | ४०.०० | ३०.०० | १०.०० | २०.०० |
| ५० | रहिमतपूर नगर परिषद क्रीडा संकुल, मौ.रहिमतपूर, ता.कोरेगांव, जि.सातारा | बंदिस्त प्रेक्षागृह | ७९.४१ | ४०.०० | ३०.०० | १०.०० | १०.०० |
| ५१ | किसान शिक्षण प्रसारक मंडळ, झाडी, ता.अंमळनेर, जि. जळगाव | बंदिस्त प्रेक्षागृह | ५०.३४ | ४०.०० | ३०.०० | १०.०० | ०५.०० |
| ५२ | नगरपरिषद रोहा, ता.रोहा जि.रायगड | अद्ययावत व्यायामशाळा साहित्य | १०.०० | ७.०० | ५.२५ | १.७५ | ५.२५ |
| ५३ | नगरपरिषद अलिबाग, ता.अलिबाग, जि.रायगड | क्रीडा साहित्य व अद्ययावत व्यायामशाळा साहित्य | ९.०५ | ७.०० | ५.२५ | १.७५ | ५.२५ |
| ५४ | किसान शिक्षण प्रसारक मंडळ, बोरगाव काळे, संचलित गोदावरी पब्लिक स्कूल, हडको, एन-१२, जि.औरंगाबाद | बंदिस्त प्रेक्षागृह | ९४.८२ | ९०.०० | ६७.५० | २२.५० | १०.०० |
| ५५ | भंडारा जिल्हा वॉटर स्पोर्टस अकादमी, ता.जि.भंडारा. | जलक्रीडा सुविधा | ५६.२० | ५०.०० | ३७.५० | १२.५० | १०.०० |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ५६ | तिरंगा बहुउद्देशिय संस्था, औरंगाबाद, प्लॉट नं., हमीद कॉलनी, औरंगाबाद | लॉन टेनिस सिंथेटिक मैदान | १०.०० | १०.०० | ७.५० | २.५० | ७.५० |
| ५७ | संगमनेर नगरपरिषद, ता.संगमनेर, जि.अहमदनगर | जलतरण तलाव जलशुध्दीकरण सयंत्रणेसह | १८६.२६ | १२०.०० | ९०.०० | ३०.०० | ३५.०० |
| ५८ | नगरपरिषद श्रीवर्धन, ता.श्रीवर्धन, जि.रायगड | बंदिस्त प्रेक्षागृह | ८९.९९ | ९०.०० | ६७.५० | २२.५० | ६७.५० |
| ५९ | नगरपरिषद रोहा ता.रोहा, जि.रायगड | बंदिस्त प्रेक्षागृह | १३७.२७ | ४०.०० | ३०.०० | १०.०० | ३०.०० |
| | **एकुण वितरीत करावयाचा निधी (लक्ष रुपयांत)** | | | | | | **८९५.००** |